श्री संत सेवालाल महाराज, पोहरादेवी
ता. मानोरा जि. वाशिम या तीर्थक्षेत्राच्या
आराखडयातील अतिरिक्त निधीच्या
विकास कामांना सुधारित प्रशासकीय
मान्यतेनुसार निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: तीर्थवि-२०१९/प्र.क्र.११५/यो-६**
**बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ**
**फोर्ट, मुंबई ४०० ००१**
**दिनांक : २९ मार्च, २०२३**

वाचा:-

१) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: तिर्थवि-२०१७/प्र.क्र.७८/ योजना-६, दि. २२ नोव्हेंबर, २०१७.

२) ग्रामविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: तिर्थवी-२०१२/प्र.क्र. ४१/ योजना- ६, दि.०८ मार्च, २०१९

३) ग्रामविकास विभागाचे पत्र क्र. तिर्थवि-२०१९/प्र.क्र.४१ (भाग१)/यो-६. दि. २२/१०/२०२१

४) जिल्हाधिकारी, वाशिम यांचे क्र.नियोजन/कक्ष-१५/संस/१४१२/२०२२ दि. २९.०९.२०२२ रोजीचे पत्र.

५) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दि. ४ जून २०१५.

६) मा. मुख्यसचिव यांचे अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या दि. १४ नोव्हेंबर, २०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

७) मा. मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय शिखर समितीच्या दि. २२ डिसेंबर, २०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

८) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: तीर्थवि-२०१९/प्र.क्र.११५/यो-६, दि.१०जानेवारी, २०२३.

९) जिल्हाधिकारी, वाशीम यांचे पत्र जा.क्र.नियोजन/कक्ष-१५/संस/११२/२०२३, दि.०६/०२/२०२३.

१०) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि.१६ मार्च, २०२३.

प्रस्तावना :-

श्रीसंत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम या तीर्थक्षेत्राच्या विकास आराखडयास संदर्भाधीन क्र.०१ व ०२ च्या शासन निर्णयान्वये रक्कम रु. १००.०० कोटी इतक्या रक्कमेच्या विकास

आराखडयास शासन मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर दि. २२/१०/२०२१ रोजीच्या पत्रान्वये सदर आराखडयातंर्गत रक्कमेत वाढ न करता कामांसाठी रू.९९.९७८ कोटी इतक्या रक्कमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भिय पत्र क्र.०४ अन्वये जिल्हाधिकारी, वाशिम यांच्याकडून सदर आराखडयातील कामे पूर्ण करण्यासाठी अतिरिक्त रू.६७.१२ कोटी इतक्या निधी मागणीचा प्रस्ताव प्राप्त झाला होता. त्यानुसार, मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समिती व मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय शिखर समितीने एकूण रु.१६७.०९ कोटी रक्कमेच्या कामांना सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली आहे. संदर्भिय पत्र क्र. ९ अन्वये जिल्हाधिकारी, वाशिम यांच्याकडून निधी मागणीचा प्रस्ताव प्राप्त झाला होता. त्यानुसार, सदर तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी करावयाच्या विकास कामांना निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

**"जिल्हाधिकारी, वाशिम यांनी सादर केलेल्या व राज्यस्तरीय समित्यांनी मान्यता दिलेल्या श्रीसंत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम या तीर्थक्षेत्रास रू.४४.०० कोटी (रू.चव्वेचाळीस कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यात येत आहे".**

३. श्रीसंत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम (२५१५ २५८४) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने या योजनेंतर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात सुधारित अंदाजामध्ये रु.१४२५०.००लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

०२. जिल्हाधिकारी, वाशिम यांनी सदर कामे पूर्ण करताना उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र. ०१, ०२, ०३, ०८ व १० मध्ये नमूद अटी-शर्ती व त्यामध्ये दिलेले संबंधित निर्देश व प्रचलित नियम लागू राहतील.

०३. सदर कामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्यांची तांत्रिक मंजूरी असल्याची व बांधकामासाठी आवश्यक जागा ग्रामपंचायत/जिल्हा परिषद मालकीची आहे, याची जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील कार्यकारी समितीने खात्री करून पुढील कार्यवाही करावी.

०४. सदर कामांचा त्यांनी वेळोवेळी आढावा घेऊन कामावर देखरेख ठेवावी व कामांचा भौतिक प्रगती अहवाल व खर्चाची माहिती विहित मुदतीत सादर करावी. तसेच, जिल्हाधिकारी, वाशिम यांनी या योजनेकरिता झालेल्या/ होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाशी ताळमेळ घेऊन त्यामध्ये तफावत राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

०५. जिल्हास्तरीय कार्यकारी समितीने कामांच्या अंमलबजावणीसाठी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांशी समन्वय साधावा व कामे विहीत कालावधीत पूर्ण होण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात.

०६. याबाबत प्राप्त होणाऱ्या निधीकरिता जिल्हा नियोजन अधिकारी / सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, वाशिम यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच जिल्हाधिकारी, वाशिम यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०७. केंद्रिय निवडणूक आयोग व राज्य निवडणूक आयोग यांनी घोषित केलेल्य निवडणूकीच्या कार्यक्रमांमुळे स्थानिक आचारसंहितेचा भंग होणार नाही, याबाबत जिल्हाधिकारी, कार्यालय वाशिम यांनी दक्षता घ्यावी.

०८. त्याचप्रमाणे सर्व संबधितांचे लक्ष या विभागाच्या शासन निर्णय दि.१६/११/२०१२ कडे वेधण्यात येत असून पशुहत्त्या व अंधश्रद्धा वाढीला प्रोत्साहन देणाऱ्या तीर्थक्षेत्रांना निधी वितरीत केला जाणार नाही. सबब,संबंधित तीर्थक्षेत्रस्थानी असे प्रकार शासनाच्या निदर्शनास आल्यास योग्य ती कार्यवाही केली जाईल व शासकीय अनुदान थांबविले जाईल.

०९. उपरोक्त कामांवरील खर्च मागणी क्र.एल ०३, २५१५ इतर ग्रामविकास कार्यक्रम १९६, जिल्हापरिषदांना सहाय्य (००) (०९) ग्रामीण भागातील यात्रास्थळांच्या विकासासाठी विशेष कार्यक्रम श्रीसंत सेवालाल महाराज, पोहरादेवी, जि.वाशिम (२५१५२५८४) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

१०. सदर निधी नियोजन विभागाचा अनौ.संदर्भ क्र.५७/१४४४ दि.२२/०२/२०२३ व वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.१०१/व्यय-१५ दि.०१/०३/२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार वितरीत करण्यात येत आहे. तसेच, वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थसंकल्प-३, दिनांक ४ एप्रिल, २०२२ मधील अटी व शर्तीचे पालन करण्यात आले आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२५१४११२३५९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, pseudonym=C66B420751C8769D652257224AF3DC28B2BA4FF1, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2023.03.29 15:16:54 +05'30'

**(का.गो. वळवी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय,मुंबई.
२) मा. मंत्री, (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. मंत्री, ग्रामविकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. राज्यमंत्री, ग्रामविकास, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता,१/२ , महाराष्ट्र, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर.
६) महालेखापाल, लेखा व परिक्षा, १/२, महाराष्ट्र, मुंबई/ महाराष्ट्र-२ नागपूर.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) मा.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) मा.प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, अमरावती विभाग, अमरावती.
१२) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम.
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम.
१४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम.
१५) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, वाशिम.
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम.
१७) नियोजन विभाग (का. १४७४ / १४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
१८) वित्त विभाग (व्यय - १५, अर्थसंकल्प- १६/१७), मंत्रालय, मुंबई ३२.
१९) कक्ष अधिकारी, कार्यासन क्र. वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्रामविकास विभाग
२०) निवड नस्ती (का. यो-६), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.